GR-200407281829090001-1100.

"कृषि संजीवनी" योजना

**महाराष्ट्र शासन**

उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग

शासन निर्णय क्रमांक :बीएलए १००३/प्र.क्र.१४१८/ऊर्जा-४,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २.१.२००४

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळाची विद्युत देयके विहीत मुदतीत मंडळास अदा न झाल्याने बीज बिलाची थकबाकी वाढत चाललेली आहे. यामुळे मंडळाची आर्थिक स्थिती धोकादायक टप्प्यात येवून पोहचली आहे. मंडळाच्या थकबाकीपैकी प्रामुख्याने कृषिग्राहकांकडील थकबाकी फार मोठ्या प्रमाणावर आहे. कृषिग्राहकांकडील थकबाकी कमी करणे मंडळाच्या आर्थिक स्थैर्यासाठी अत्यावश्यक झाले आहे तसेच राज्यातील दुष्काळी परिस्थिती लक्षात घेता बीज बिलाची रक्कम मंडळाकडे विहीत मुदतीत अदा करणे कृषिग्राहकाना जिकीरीचे आहे. या बाबींचा सांगोपांग विचार करुन बीज बिलाच्या थकबाकीतून शेतक-याना दिलासा देण्यासाठी तसेच मंडळाच्या आर्थिक स्थैर्यासाठी उपाययोजना करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार खालील प्रमाणे "कृषि संजीवनी" योजना अंमलात आणण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

"कृषि संजीवनी" योजनेअंतर्गत शेतक-यांच्या थकबाकीपैकी ५० टक्के रक्कम व थकबाकीवरील संपूर्ण व्याज व दंडनीय रक्कम माफ करण्यात येणार आहे.

१ एप्रिल २००३ ते ३० सप्टेंबर,२००३ या कालावधीची चालू बिले पूर्णपणे भरणा-या शेतक-यांनाच ही योजना लागू राहिल. हे चालू बील भरण्याची मुदत ३१ जानेवारी,२००४ पर्यन्त वाढविण्यात येत आहे.

या योजनेंतर्गत थकबाकीदार शेतक-यांनी त्यांच्या १ एप्रिल २००३ पर्यन्तच्या थकित बीज बिलापैकी ५० टक्के रक्कम ३१ मार्च २००४ पूर्वी भरल्यास उर्वरीत ५० टक्के रक्कमेची प्रतिपूर्ती महाराष्ट्र शासन शेतक-यांच्या वतीने बीज मंडळास अदा करील. अशा रितीने थकबाकीदारांची संपूर्ण रक्कम बीज मंडळाकडे जमा झाल्यानंतर थकित रकमेवरील व्याजापैकी ५० टक्के व्याज बीज मंडळ माफ करील. उरलेले ५० टक्के व्याज महाराष्ट्र शासन बीज मंडळास अदा करील. बीज मंडळ सदर थकबाकीवरील दंडणीय रक्कम माफ करेल.

आतापर्यन्त नियमितपणे बीज बिले भरत आलेल्या शेतक-यांनाही शासनाने सवलत जाहीर केली आहे. १ ऑक्टोबर २००३ पर्यन्तच्या कालावधीसाठी कोणतीही थकबाकी नसलेल्या शेतक-यांना या पुढील चार त्रैमासिक बिलांमध्ये ५० टक्के सूट देण्यात येईल. या सवलतीची रक्कम महाराष्ट्र शासन बीज मंडळास अदा करील.

ही योजना मूळा-प्रवरा सोसायटीच्या कार्यक्षेत्रातील शेतक-यांना तसेच सहकारी उपसा सिंचन योजनांनाही लागू राहील.

सदर योजनेंतर्गत शासनाकडून मंडळास देण्यात येणा-या कृषिग्राहकासाठीच्या थकबाकीपोटीच्या अनुदानाची रक्कम संबंधित कृषिग्राहकाच्या बीज देयकामध्ये दर्शविण्यात यावी.

सदर योजनेनुसार शासनाकडून म.रा.वि.मंडळास देय रक्कम ही मंडळाकडून येणे असलेल्या कर्जामध्ये वळती करण्यात येईल.

उक्त योजना महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहील. महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाच्या आदेशानुसार सदर योजनेत यथोचित बदल करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(र.ना.अंबरित)
शासनाचे उप सचिव.

प्रति,

अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, प्रकाशगड, बांद्रे (पूर्व), मुंबई-४००० ०५१.
अध्यक्ष, मुळा-प्रवरा इलेक्ट्रिक को. ऑप. सोसायटी लि., श्रीरामपूर, जि.अहमदनगर
सचिव, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर नं.१, १३ मजला,
कफपरेड, मुंबई-४००००५.